"एतदर्थ मंडळ - मराठी टंकलेखन व लघुलेखन परीक्षा" मंडळावर शासकीय सदस्यांची नियुक्ती करण्याबाबत.

# महाराष्ट्र शासन

## मराठी भाषा विभाग

**शासन निर्णय क्रमांक : मटंप-२०२१/प्र.क्र.११३/भाषा-२**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक,
मंत्रालय, मुंबई-४०००३२
दिनांक :-२० सप्टेंबर, २०२१

**वाचा :-**

१) मराठी भाषा विभाग, शासन निर्णय क्र. मटंप-२०१६/प्र.क्र.१५/भाषा-२, दि.२६.०७.२०१६.
२) भाषा संचालनालयाचे क्र. मटंप-२०१८/प्र.क्र.९१/७२०/चौदा, दि.२८.०७.२०२१ चे पत्र.

**प्रस्तावना :-**

राज्य सरकारी कर्मचाऱ्यांच्या मराठी टंकलेखन व मराठी लघुलेखन परीक्षा घेणाऱ्या एतदर्थ मंडळाला मराठी भाषा विभागाच्या संदर्भाधीन दि.**२६.०७.२०१६** च्या शासन निर्णयान्वये कायमस्वरुपी मान्यता देण्यात आलेली आहे. शासन सेवेत इंग्रजी लिपिक-टंकलेखक, इंग्रजी टंकलेखन, इंग्रजी लघुलेखक यांची शासनाच्या आवश्यकतेनुसार पदभरती होत असते. सदर मंडळ कार्यरत असणे आवश्यक आहे. त्याअनुषंगाने मराठी टंकलेखन व मराठी लघुलेखन परीक्षा घेणाऱ्या एतदर्थ मंडळाच्या शासकीय सदस्यांची नेमणुक करण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

## शासन निर्णय:-

शासन सेवेत नियुक्त झालेल्या इंग्रजी लिपिक-टंकलेखक, इंग्रजी टंकलेखक, इंग्रजी लघुलेखक यांच्यासाठी मराठी लघुलेखन / टंकलेखन परीक्षा आयोजित करणाऱ्या "एतदर्थ मंडळ-मराठी टंकलेखन व लघुलेखन परीक्षा" या मंडळास दि.०१.०४.२०१६ पासून कायमस्वरुपी मुदतवाढ शासन निर्णय, दि.**१६.०७.२०१६** अन्वये देण्यात आलेली आहे. सदर मंडळावरील शासकीय सदस्य श्री.नरेंद्र तातोबा खंदारे, हे नियत वयोमानानुसार सेवानिवृत्त झाल्याने त्यांच्या जागी शासकीय सदस्य म्हणून श्रीमती स्नेहा संजय वालावलकर, लघुलेखिका (उच्चश्रेणी/मराठी) यांची नियुक्ती करण्यास शासन मान्यता देण्यात येत असून मंडळाची रचना खालीलप्रमाणे राहील :-

| अ.क्र. | नाव | पद |
|---|---|---|
| १ | भाषा संचालक, भाषा संचालनालय, मुंबई | अध्यक्ष |
| २ | श्रीमती नीला वैद्य,बी-१/२१, गणेश सोसायटी, ठाणे (प.)-४००६०१ | अशासकीय सदस्य |
| ३ | श्रीमती स्नेहा संजय वालावलकर, लघुलेखिका (उच्चश्रेणी/मराठी), परिवहन आयुक्त कार्यालय, वांद्रे (पूर्व), मुंबई-५१ | सदस्य |
| ४ | सहायक भाषा संचालक, प्रशिक्षण व आस्थापना, भाषा संचालनालय, मुंबई | सदस्य |

सदर मंडळावरील सदस्यांचा कार्यकाळ संपल्यानंतर किंवा शासनाचे पुढील आदेश होईपर्यंत नवीन सदस्यांची नियुक्ती करण्याचे अधिकार शासनास राहतील.

सदर मंडळाच्या बैठकीसाठी होणारा खर्च भाषा संचालनालयाच्या मंजूर अनुदानातून भागविण्यात येईल. तसेच मंडळाच्या शासकीय व अशासकीय सदस्यांना वित्त विभागाच्या प्रचलीत नियमानुसार प्रवास भत्ता, दैनिक भत्ता तसेच बैठकभत्ता अनुज्ञेय राहील.

यासाठी होणार खर्च भाषा संचालनालयाच्या मागणी क्र.झेडएफ-०१, २०५२, सेक्रेटरिएट सर्वसाधारण सेवा, ०० ०९०, सेक्रेटरिएट (००)(००)(०२) भाषा संचालक, १३ कार्यालयीन खर्च, २०५२ ५०६३ या लेखाशिर्षाखाली त्या त्या वित्तीय वर्षात उपलब्ध होणाऱ्या मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

सदर आदेश वित्त विभागाच्या अनौसं.क्र.४६२/१६/व्यय-४,दि.१६.०७.२०१६ अन्वये प्राप्त मंजुरीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२१०९२०१२३६०३९९३३ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

MILIND BHAGWAN GAWADE

Digitally signed by MILIND BHAGWAN GAWADE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=MARATHI LANGUAGE DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=d043e1f55c6ded344ffebea8801d8c286bfdcafaea54c716c9b31b47b87a9476, pseudonym=3FD721BE2B19DF245E0157FD3DC7B26475009465, serialNumber=EF777B84EAC7F675E3493144EF06F0FA1CB47DE2A32BE1156CA04D038F42D6E1, cn=MILIND BHAGWAN GAWADE
Date: 2021.09.20 12:40:54 +05'30'

( मिलिंद गवादे )

**सह सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा.राज्यपाल यांचे सचिव,
२. मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मुख्यमंत्री सचिवालय, मंत्रालय, मुंबई.
३. मा.मंत्री, मराठी भाषा यांचे विशेष कार्य अधिकारी,
४. मा.राज्यमंत्री, मराठी भाषा यांचे विशेष कार्य अधिकारी,
५. प्रबंधक उच्च न्यायालय, मुळ शाखा, मुंबई (पत्राने)
६. प्रबंधक उच्च न्यायालय, अपिल शाखा, मुंबई (पत्राने)
७. प्रधान सचिव(मराठी भाषा) यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.
८. सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, विधानभवन, मुंबई
९. सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग,मुंबई (पत्राने)

१०.सह सचिव(मराठी भाषा) यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.

११.महालेखापाल, महाराष्ट्र १/२ (लेखा परिक्षा/लेखा अनुज्ञेयता), मुंबई/नागपूर

१२.अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई

१३.निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई

१४.भाषा संचालक, भाषा संचालनालय, महाराष्ट्र राज्य, वांद्रे, मुंबई

१५.सर्व मंत्रालयीन विभाग,

१६.एतदर्थ मंडळाचे सर्व सदस्य ( भाषा संचालनालयामार्फत )

१७.वित्त विभाग (व्यय-४), मंत्रालय, मुंबई

१८. सर्व अवर सचिव/कक्ष अधिकारी, मराठी भाषा विभाग, मंत्रालय, मुंबई.

१९.निवडनस्ती (भाषा-२).